**उल्हासनगर महानगरपालिका ठराव क्रमांक ३२,**
**दिनांक २०.११.२०१३ निलंबित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः युएमसी-२५१४/प्र.क्र.२४२/नवि-२१

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १९ मार्च, २०१५

**वाचा :-**

१) **उल्हासनगर महानगरपालिका ठराव क्र ३२, दि.२०.११.२०१३**
२) **आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका यांचे पत्र क्र.उमपा-आका/३५०/२०१४, दि.२०.१.२०१४**

**प्रस्तावना :-**

राज्य मार्ग क्रमांक ३५ रुंदीकरणासाठी उल्हासनगर महानगरपालिका क्षेत्रातील अतिक्रमणे काढण्याबाबत मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने महानगरपालिकेस कळविले होते. सदर रस्ता रुंदीकरणाचा निर्णय एमएमआरडीए ने घेतला आहे. एमएमआरडीए ने रुंदीकरणासाठी प्रस्तावित केलेले रस्ते महानगरपालिकेच्या हददीतून जातात, त्या भागात त्यांची सुधारणा विकास आराखडयातील रुंदीनुरूप प्रस्तावित करण्यात आली आहेत. कल्याण-अंबरनाथ रस्त्याच्या रुंदीकरणाची १०० फूटाची मर्यादा प्राप्त करण्यासाठी डावी बाजूकडील ४५० व रस्त्याचे उजव्या बाजूकडील ३६१ अशी एकूण ८२१ बांधकामे बाधित होणार आहेत. ही बाधित होत असलेली बांधकामे अनधिकृत असून त्या जागेची मालकी शासकीय आहे. कल्याण हून अंबरनाथ पुढे बदलापूर-वांगणी कडे जाणा-या राज्य मार्ग क्रमांक ३५ च्या रुंदीकरणाचा एमएमआरडीए चा प्रस्ताव आहे. सदर रस्त्याचे १०० फूट रुंदीकरण करण्यासाठी त्या क्षेत्रात येणारी जी अनधिकृत बांधकामे आहेत ती काढण्याची जबाबदारी त्या त्या महानगर/नगर प्राधिकरणाची आहे. तसेच त्या ठिकाणी ज्या सेवावाहिन्या महानगरपालिकेने टाकल्या आहेत त्या अन्यत्र हलविण्याची जबाबदारीही त्या त्या प्राधिकरणाची आहे. जनतेचा प्रवास सुकर व्हावा, तसेच वाहनांची कोंडी होवून नागरीकांना त्रास होणार नाही यासाठी सदर रस्त्याचे रुंदीकरण आवश्यक आहे. परंतु उल्हासनगर महानगरपालिकेच्या महासभेने सदर रस्ता १०० फूट ऐवजी ८० फूट ठेवण्याबाबतचा ठराव क्रमांक ३२, दिनांक २०.११.२०१३ पारीत केला. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका यांनी त्यांच्या दिनांक २०.१.२०१४ च्या पत्रान्वये सदर ठराव विखंडीत करण्याची विनंती केली आहे. आयुक्तांच्या विनंतीनुसार उल्हासनगर महानगरपालिका क्षेत्रातून जाणारा रस्ता १०० फूट ऐवजी ८० फूट करण्याचा महासभेचा ठराव क्रमांक ३२ विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

उल्हासनगर महानगरपालिकेने पारीत केलेला ठराव क्रमांक ३२, दिनांक २०.११.२०१३ हा लोकहिताच्या दृष्टीकोनातून अयोग्य असून शासनाच्या ध्येयधोरणाशी विसंगत असल्यामुळे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ मधील तरतुदीनुसार निलंबित करण्यात येत असून संबंधितांचे निवेदन ३० दिवसांच्या आत मागविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१६०५१८०५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashrta, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2015.03.20 16:16:37 +05'30'

**(स.दि. खरात)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महापौर, उल्हासनगर महानगरपालिका
२. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका
३. मा. मुख्यमंत्री महोदयांचे उपसचिव
४. सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
५. निवड नस्ती (नवि-२१)